**निम्न तापी प्रकल्पाच्या कामासाठी निम्न तापी प्रकल्प विभाग, चोपडा हे विभागीय कार्यालय अमळनेर येथे स्थलांतरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१६/व्हीआयपी-१३६/प्र.क्र.२७५ /२०१६/आ.(प्रशि.),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख : ०३ एप्रिल, २०१७.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक १०९२/ सीआर/ ८०६/व्यय-६, दि.१५/१०/१९९२.
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक आढावा-१००२/३३५/२००२/आ.(प्रशि.), दि.०६/०२/२००३.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक आढावा-२०१४/प्र.क्र.२१०/२०१४/ आ.(प्रशि.), दि.२७/०८/२०१४.

**प्रस्तावना -**

जळगांव जिल्ह्यातील निम्न तापी प्रकल्पाचे ८०% लाभक्षेत्र हे अमळनेर व पारोळा तालुक्यामध्ये विस्तारीत आहे. निम्न तापी प्रकल्पाशी संबंधित अमळनेर येथील दिवाणी न्यायालयातील भूसंपदनाच्या प्रकरणांचा तसेच इतर प्रशासकीय कार्यालयांकडे कामाचा पाठपुरावा करण्यासाठी व प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्तीसाठी अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव यांचे नियंत्रणाखाली कार्यरत कार्यकारी अभियंता, निम्न तापी प्रकल्प विभाग, चोपडा हे विभागीय कार्यालय अंतर्गतच्या २ उपविभाग कार्यालयांसह अमळनेर येथे तर १ उपविभाग हातेड येथे प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव यांचे नियंत्रणाखाली कार्यरत कार्यकारी अभियंता, निम्न तापी प्रकल्प विभाग, चोपडा हे विभागीय कार्यालय अंतर्गतच्या ३ उपविभाग कार्यालयांसह स्थलांतरीत करण्यास खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे .

- कार्यकारी अभियंता, निम्न तापी प्रकल्प विभाग, चोपडा हे विभागीय कार्यालय कार्यकारी अभियंता, निम्न तापी प्रकल्प विभाग, अमळनेर या नावाने तर उप

अभियंता, निम्न तापी धरण उपविभाग क्र.१, हातेड व उप अभियंता, निम्न तापी धरण उपविभाग क्र.२, हातेड हे दोन उपविभाग अनुक्रमे उप अभियंता, निम्न तापी धरण उपविभाग क्र.१, अमळनेर व उप अभियंता, निम्न तापी धरण उपविभाग क्र.२, अमळनेर या नावाने अमळनेर येथे कार्यान्वित करणे.

- उप अभियंता, निम्न तापी पुनर्वसन उपविभाग, घोडगांव हे उपविभागीय कार्यालय उप अभियंता, निम्न तापी पुनर्वसन उपविभाग, हातेड या नावाने हातेड येथे कार्यान्वित करणे.
- विभागीय व उपविभागीय कार्यालयांच्या मुख्यालयात झालेल्या बदलानुसार निम्न तापी प्रकल्प विभाग कार्यालयांतर्गतची उपविभागीय कार्यालयांची रचना खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | विभाग व अंतर्गत कार्यरत उपविभाग | कार्यालयात झालेला बदल. |
|---|---|---|
| **१** | **निम्न तापी प्रकल्प विभाग, अमळनेर (बांधकाम)** | **विभागाच्या मुख्यालयात बदल** |
| १.१ | निम्न तापी धरण उपविभाग क्र.१, अमळनेर (बांधकाम) | उपविभागाच्या मुख्यालयात बदल |
| १.२ | निम्न तापी धरण उपविभाग क्र.२, अमळनेर (बांधकाम) | उपविभागाच्या मुख्यालयात बदल |
| १.३ | निम्न तापी पूनर्वसन उपविभाग, हातेड (बांधकाम) | उपविभागाच्या मुख्यालयात बदल |
| १.४ | निम्न तापी पूनर्वसन उपविभाग, चोपडा (बांधकाम) | --- |
| १.५ | निम्न तापी प्रकल्प उपविभाग, अमळनेर (बांधकाम) | --- |
| १.६ | निम्न तापी धरण उपविभाग क्र.३, अमळनेर (बांधकाम) | --- |

२. उपरोक्त प्रमाणे विभागीय कार्यालयांमध्ये होणाऱ्या बदलास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(अ) स्थलांतरीत विभाग व उपविभागीय कार्यालये मुळ कार्यभारासह व मंजूर पदांसह स्थलांतरीत मुख्यालयाच्या ठिकाणी कार्यरत राहील.

(आ) स्थलांतरीत कार्यालये शासकीय जागेतच कार्यान्वित करण्यात यावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग/ उपविभागांतील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार, स्थलांतरीत विभागीय

कार्यालयाचे "कार्यकारी अभियंता" हे आहरण व संवितरण अधिकारी व मंडळ कार्यालयाचे "अधीक्षक अभियंता" हे नियंत्रण अधिकारी म्हणून याव्दारे घोषित करण्यात येत आहे.

५. विभागीय/ उपविभागीय कार्यालयांच्या मुख्यालय बदलानुसार सदरहू कार्यालये दिनांक १७.०४.२०१७ पासून कार्यान्वित होईल याद्दष्टीने कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव कार्यालयाने आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर-८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०३१६१४२२१७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.04.03 16:15:40 +05'30'

**( वि.का.चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा. मंत्री (खारभूमी), यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा. विधानपरिषद व विधानसभा सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (जसंप्र व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ व २, महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर
११) महालेखापाल (लेखा परीक्षा ) १ व २, महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३) सर्व महासंचालक व सर्व कार्यकारी संचालक (महासंचालक व महामंडळ कार्यालये)
१४) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१७) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१८) आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव.
२०) अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई.
२१) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीरण विभाग, पुणे
(यांना विभाग/ उपविभाग कार्यालयांच्या मुख्यालय बदलाची आवश्यक नोंद घेण्यास्तव अग्रेषित.)
२२) कार्यकारी अभियंता, निम्न तापी प्रकल्प विभाग, अमळनेर (पूर्वीचे मुख्यालय चोपडा)
२३) सर्व कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) आस्थापना (प्रशिक्षण) निवडनस्त व संग्रहार्थ.

**********